**अर्थसंकल्पीय अनुदान-सन २०२३-२४...**
**स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II अंतर्गत**
**अनुसूचित जमाती घटकाखाली (राज्य हिस्सा)**
**निधी वितरित करणेबाबत...**
**(लेखाशीर्ष २२१५ A१६८)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०२४/प्र.क्र.२६/पापु-०८
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: ३१ मार्च, २०२४.

<u>वाचा</u>

१. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक: क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३.**
२. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक: क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३.**
३. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक: क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. ०४.०३.२०२४.**
४. **आदिवासी विकास विभागाचे शासन परिपत्रक: क्र .बीयुडी -२०२४/प्र.क्र.५०/कार्यासन-६, दि. १३.०३.२०२४**
५. **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०२४/प्र.क्र.२६/पापु-०८, दि. १५.०३.२०२४.**
६. **केंद्र शासनाचे पत्र क्रमांक: S-१२०११/१०/२०२२-SBM-DDWS, दि. २२.०३.२०२४.**
७. **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०२४/प्र.क्र.२६/पापु-०८, दि. ३१ .०३.२०२४.**

<u>प्रस्तावना</u>

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II योजनेअंतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी २२१५ A१६८ या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षाकरीता राज्य हिस्सा अंतर्गत रु.५००.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली असून, त्याचप्रमाणे सुधारीत अंदाज मंजूर करण्यात आले आहेत. वाचा क्र.६ येथील केंद्र शासनाच्या मंजूरी आदेशान्वये स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II अंतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी केंद्र हिस्सा अंतर्गत रु.१३७९.७० लक्ष (तेरा कोटी एकोणऐंशी लक्ष सत्तर हजार फक्त) इतका निधी प्राप्त झाला आहे. सदर रु.१३७९.७० लक्ष (तेरा कोटी एकोणऐंशी लक्ष सत्तर हजार फक्त) इतका निधी, वाचा क्र. ७ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II अंतर्गत अनुसूचित जमाती घटकाखालील केंद्र हिस्सा रु.१३७९.७० लक्ष (तेरा कोटी एकोणऐंशी लक्ष सत्तर हजार फक्त) निधीस

समरुप राज्य हिश्श्याखाली रु.९१९.८० लक्ष (रूपये नऊ कोटी एकोणीस लक्ष ऐंशी हजार फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. तथापि, मंजूर सुधारीत अंदाज रु. ५००.०० लक्ष पैकी रु. ४६०.०७ लक्ष इतका निधी वाचा क्र.५ अन्वये यापूर्वी वितरित करण्यात आला असून, रु. ३९.९३ लक्ष इतका निधी शिल्लक आहे. तथापि, आता सदर रु.९१९.८० लक्ष (रूपये नऊ कोटी एकोणीस लक्ष ऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरित करावयाचा असल्याने सदर लेखाशिर्ष २२१५ A१६८खाली पुरेशी तरतुद उपलब्ध नसल्याने रु.८७९.८७ लक्ष इतका अतिरिक्त निधी पुनर्विनियोजनाद्वारे जल जीवन मिशनच्या लेखाशिर्ष २२१५ A०६१ व आदिवासी विकास विभागाच्या खावटी कर्ज योजनेच्या २४२५ १४९३ या लेखशीर्षातून वित्त विभाग व आदिवासी विकास विभागाकडून उपलब्ध करून देण्यात आलेला आहे. त्यामुळे स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-॥ अंतर्गत अनुसूचित जमाती घटक राज्य हिश्श्याखाली रु. ९१९.८० लक्ष (रूपये नऊ कोटी एकोणीस लक्ष ऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-॥ अनुसूचित जमाती घटक अंतर्गत, (२२१५ A१६८) या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षाकरीता राज्य हिस्सा रु.९१९.८० लक्ष (रूपये नऊ कोटी एकोणीस लक्ष ऐंशी हजार फक्त) इतका निधी, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात आहरित करुन, योजनेच्या State Nodal Account (SNA) खात्यात जमा करण्यासाठी अतिरिक्त अभियान संचालक (स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याकडे सूपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. "सदर निधी केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-॥ योजनेच्या State Nodal Account (SNA) खात्यात जमा करण्याकरिता आहरण व संवितरण अधिकारी, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव, (श्री.अ.नि.धस), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव (श्री.राजेंद्र गेंगजे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव, (श्री.अ.नि.धस), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर रु.९१९.८० लक्ष (रूपये नऊ कोटी एकोणीस लक्ष ऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून अतिरिक्त अभियान संचालक (स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याकडील स्वच्छ भारत अभियान (ग्रा) टप्पा-॥

योजनेच्या SNA खात्यात जमा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे."

३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

I. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच करणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित संस्था यांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

II. संबंधित संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

III. अट क्र.I आणि II यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

IV. सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

V. ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-०८ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

VI. राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

VII. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

VIII. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करून दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तथापि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

IX. सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. हा खर्च "मागणी क्रमांक टी-५, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२, मलप्रणाल व स्वच्छता ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना (०१), जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) (०४) स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) अंतर्गत वैयक्तिक शौचालय बांधणी, घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन व इतर अनुषंगिक कामे (राज्य हिस्सा ४० टक्के) (२२१५ A१६८)" ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा.

५. सदर शासन निर्णय शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०८.१२.२०२३ व दिनांक ०४.०३.२०२४ आणि शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र .बीयुडी -२०२४/प्र.क्र.५०/कार्यासन-६, दि. १३.०३.२०२४ तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४१९/२०२४/व्यय-१४ व आदिवासी विकास विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक २६/२०२४/का-६ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१५४७०१२७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HARSH BHANUDAS JAGADALE

Digitally signed by HARSH BHANUDAS JAGADALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=4d681616973b9509460f63155f2d1d3dffe33d046d2adc8504f466852619624e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=48EF41A6A6D899B8BCF71B256164BA84DEF4261D73071D543D129EFBC0C5B6FF, cn=HARSH BHANUDAS JAGADALE
Date: 2024.03.31 12:35:43 +05'30'

(हर्ष जगदाळे)

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता)
३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
५. अतिरिक्त अभियान संचालक(स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर.
६. जिल्हा समन्वयक, स्वच्छ भारत मिशन/उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
७. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
९. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१०. नियोजन विभाग, (कार्यासन-६) मंत्रालय, मुंबई.

११. आदिवासी विकास विभाग, (कार्यासन-६) मंत्रालय, मुंबई
१२.वित्त विभाग, (व्यय-३,१४) मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती, कार्यासन पापु-०८ .